**राज्यातील दुय्यम न्यायालयातील कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) घेतलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना शासन निर्णय निर्गमित केलेल्या दिनांकापासून ३ आगाऊ वेतनवाढ मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.एचसीटी-२००८/४२७/प्र.क्र.३५८/ का.तीन.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : -१ ऑगस्ट, २०१७.

**वाचा/ पहा** :- १) शासन निर्णय, क्र.एचसीटी-३००३/(६२)-तीन, दि.०४.०७.२००३.
२) शासन निर्णय, क्र.एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का.तीन, दि.२२.१०.२०१०.

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दि.२१.०३.२००२ च्या न्यायनिर्णयान्वये, मा.न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी विवक्षित करुन स्वीकारल्या आहेत व त्यानुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना उच्च वेतनश्रेणी वेतन आणि केंद्र शासनाच्या दराप्रमाणे महागाई भत्ता देण्याची शिफारस केली आहे. महाराष्ट्र शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयास अनुसरुन दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना मा.न्या.शेट्टी आयोग यांनी केलेल्या शिफारशीनुसार वेतन व भत्ते/सुविधा हया दि.०४.०७.२००३ व २३.०७.२००४ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेल्या आहेत. मा.न्या.शेट्टी आयोगाने राज्यातील दुय्यम न्यायालयातील कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) घेतलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना ३ आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याची शिफारस केलेली होती. त्यानुषंगाने राज्यातील दुय्यम न्यायालयातील कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) घेतलेल्या न्यायिक अधिकाऱ्यांना एकदाच ३ आगाऊ वेतनवाढी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता :-

**शासन निर्णय :-**

न्यायिक अधिकाऱ्यांनी सेवेत येण्यापूर्वी किंवा सेवेत आल्यानंतर कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) ही पदवी धारण केलेली असेल तर त्यांना एकदाच ३ आगाऊ वेतनवाढीचा लाभ मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वेतनवाढीचा लाभ हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून देय राहील. यापूर्वीची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

३. सदर वेतनवाढ देण्याची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | **३ आगाऊ वेतनवाढी देण्याची कार्यपध्दती** | |
|---|---|---|
| १ | न्यायिक अधिकारी सेवेत नियुक्त होणेपूर्वी कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) ही पदवी धारण केलेली असल्यास, | ज्या पदावर न्यायिक अधिकारी प्रथम नियुक्त झालेला आहे त्या दिनांकाला त्या पदाच्या वेतनश्रेणीत ३ आगाऊ वेतनवाढीचा काल्पनिक लाभ देऊन वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| | | ३ आगाऊ काल्पनिक वेतनवाढ गृहित धरुन करण्यात आलेल्या वेतननिश्चितीनुसार आश्वासित प्रगती योजनेच्या/पदोन्नतीच्या वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| | | उपरोक्तनुसार आश्वासित प्रगती योजनेच्या /पदोन्नतीच्या प्रत्येक टप्प्यातील वेतन निश्चित करुन सध्या कार्यरत असलेल्या पदाची वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| २ | न्यायिक अधिकारी सेवेत नियुक्त झाल्यानंतर कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) ही पदवी धारण केलेली असल्यास, | ज्या दिनांकाला सदर अधिकाऱ्याने कायद्याचे पदव्युत्तर शिक्षण (L.L.M.) ही पदवी धारण केली त्या दिनांकाला तो कार्यरत असलेल्या पदावरील घेत असलेल्या वेतनश्रेणीत ३ आगाऊ वेतनवाढीचा काल्पनिक लाभ देऊन वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| | | ३ आगाऊ काल्पनिक वेतनवाढ गृहित धरुन करण्यात आलेल्या वेतननिश्चितीनुसार आश्वासित प्रगती योजनेच्या/पदोन्नतीच्या वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| | | उपरोक्तनुसार आश्वासित प्रगती योजनेच्या /पदोन्नतीच्या प्रत्येक टप्प्यातील वेतन निश्चित करुन सध्या कार्यरत असलेल्या पदाची वेतननिश्चिती करण्यात यावी. |

४. उपरोक्तप्रमाणे ३ आगाऊ वेतनवाढी देताना आश्वासित प्रगती योजनेचा/पदोन्नतीचा/निवडश्रेणी /उच्च समयश्रेणी यांचा लाभ दिला असल्यास त्या त्या वेतनश्रेणीत पुन्हा ३ आगाऊ वेतनवाढीचा लाभ अनुज्ञेय असणार नाही.

५. राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना ३ आगाऊ वेतनवाढी देण्याबाबतचा खर्च संबंधित न्यायिक अधिकारी घेत असलेल्या वेतनावरील लेखाशिर्षाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७८७/२०१७/व्यय-५,दि. २९.०७.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०११०४४१८८४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

N J Jamadar

Digitally signed by N J Jamadar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary And Senior Legal Advisor, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1a04c87922c611cd86db0417549c441857561c576c21b21f3c8d180884505e, cn=N J Jamadar
Date: 2017.08.01 10:49:39 +05'30'

**( एन.जे.जमादार )**
**प्रधान सचिव व विधि परामर्शी**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा,
४. मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) आणि त्यांचे स्वीय सहायक,
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६. अ.मु.स.(व्यय), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई,
७. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (विधि विधान), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१४. महालेखापाल-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५. महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१६. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
१७. मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई,
१८. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, महाराष्ट्र राज्य,
१९. प्रमुख न्यायाधीश,सर्व कौटुंबिक न्यायालये,
२०. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
२१. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२२. विधि व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने,
२३. वित्त विभाग (व्यय-५/सेवा-३ )
२४. निवड नस्ती.